# तर जीवन जांभळासारखे गोड, तजेल आणि रसाळ होईल

इजामसाय काटेंगे

आमचे गाव साल्हे. गडचिरोली जिल्ह्यातील कोरची तालुक्यात ते येते. कोरचीपासून ते दोन कि.मी. अंतरावर आहे. गाव पूर्णपणे आदिवासी आहे. ४० घरांची वस्ती. एक घर दलितांचे आहे. आम्ही गोंडी बोलतो. गावातील सर्वांजवळ जमिनी आहेत, फक्त एका कुटुंबाकडे जमीन नाही. प्राथमिक शाळा आहे. चौथीपर्यंतचे शिक्षण तेथे मिळते. गावात नोकरी करणारा कोणी नाही. महिना पगार मिळवणारा कोणी नाही. जीवन सारे शेतीवर व जंगलावर अवलंबून. मोजमजुरी करणे, जंगलातील वेगवेगळ्या मोसमांत राबून गुजराण करणे ही येथील जगण्याची रीत आहे. आमचे जीवन जमिनीपेक्षा जंगलावर अधिक अवलंबून आहे. शेती पावसावर अवलंबून आहे. त्यात अनिश्चितता असते. पाऊस योग्य वेळेला झाला तर धानाचे पीक पदरात पडते. शेतीची कामे संपल्यावर जंगलातील कामांना सुरुवात होते. त्यावर गुजराण होते. पैशाची गरज भागवता येते. जंगलातून हिरडा, बेहडा, आवळा, लाकूडफाटा गोळा करणे अशी छोटी-मोठी कामे करून उदरनिर्वाह चालतो. गावाचे जंगल आहे. ते जंगल म्हणजे आमची बँक असल्यासारखेच आहे. जमीन, जंगल ही आमची जगण्याची मुख्य साधने. त्यालाच तुम्ही मंडळी नैसर्गिक संसाधने म्हणता. त्यांवर जगण्याची आमची रीत संयमी होती. पैशासाठी त्यांचा मुळापासून ऱ्हास करण्याची बुद्धी होत नसे. हळूहळू ती रीत कमजोर होऊ लागली. आता आम्हाला देखील या जगवणाऱ्या साधनांपेक्षा पैसा मोठा वाटू लागलाय! दर वर्षाच्या चक्रात मोहाचा सीझन येतो, दोन-तीन हजार रुपये मिळतात. तसाच तेंदूपत्त्याचा सीझन येतो. त्यानंतर बांबू-कटाईत मजुरी मिळते. टोळाच्या फुलाचा सीझन येतो. असे नित्य जगण्याला लागणाऱ्या गोष्टींबरोबर मिळकत देणारे सीझनही येतात, त्यामुळे आमच्या जगण्याच्या गरजा भागवण्यास मदत होते. या पैशात पावसाळ्यातील भूक, हाडुक मासातील देणे, कर्ज आम्ही फेडू शकतो.

आमचे तरुणांचे एक अभ्यासमंडळ आहे. आमचे एक छोटेसे ग्रंथालय आहे. त्याच्या आवारात बसून आम्ही आमच्या जगण्यातील प्रश्नांची चर्चा करतो. आम्हाला जगण्यासाठी लागणारे तसे पुरेसे असताना आमच्या मागे भुकेचा ससेमिरा कां? हे कर्जाचे, व्याजाचे नित्य झंझट कां? असे प्रश्न नेहमी चर्चेला येतात. जंगलातून २०-२५ हजारांची मिळकत मिळूनही आमचे दैन्य कां संपत नाही? त्यातूनच मिळकतीचे मार्गही आम्ही शोधत असतो. आमच्या जांभळाच्या संपत्तीकडे आमचे लक्ष गेले. त्यावर आम्ही चर्चा करीत गेलो. आमच्या जंगलात जांभळाची भरपूर झाडे आहेत. अतिशय गोड, मोठी, जाड सालींची जांभळं. पण खाण्याव्यतिरिक्त व सडण्याव्यतिरिक्त त्यांना आमच्या जीवनात स्थान नव्हते. जनावरांना त्यांची पाने खायला देत. पक्षी खात. पण माकडे जांभळे खात नसत. १९९० नंतर काही व्यापारी येऊ लागले. नागपूरचे, चंद्रपूरचे व्यापारी, दलाल लोकांना जांभळे तोडून देण्यास सांगू लागले. ३५-४० किलो वजनाचे जांभळाचे डाग व्यापारी नागपूरला नेऊ लागले. आम्ही जांभळाच्या व्यवहाराचा, बाजाराचा अभ्यास केला. आढळून आले की त्यांचे २५-३० रुपयांचे डाग २५०-३०० रुपयांना विकले जात आहेत. नागपूरच्या अभ्यास-सहलीनंतर तरुणांनी जांभळाचा व्यवसाय आपणच करावा, असे ठरवले. त्या वर्षापासून ४-५ युवक यामागे लागले. २००२ पर्यंत सारे गाव जांभळाच्या व्यवसायात सामील झाले. प्रत्येक कुटुंब आपापल्या घरातील माणसांकरवी जांभळे तोडून गोळा करते. वाहतुकीचा खर्च सामूहिक असतो. सध्या गावात जांभळाच्या व्यवसायातून एक-दीड लाख रुपये येऊ लागले आहेत. प्रत्येक डागामागे काही रक्कम ग्रामसभेला मिळते. गेल्या वर्षी असा २७०० रुपये फायदा ग्रामसभेला झाला. आता प्रत्येक कुटुंबाला ३०००-४००० रुपये मिळकत जांभळातून होऊ लागली आहे. या व्यवसायात कोणाची फसवणूक होऊ नये हे कटाक्षाने पाहिले जाते. ग्रामसभेने झाडांना इजा न पोहोचवता तेंदूपत्ता, जांभळे तोडावीत असा नियम केला आहे.

गावातील कुटुंबांचे उत्पन्न वाढले. पण शाळेची स्थिती सुधारली नाही. उलट लग्न, देवकाम, करसाळ (दिवसकार्य) अशा कार्यक्रमांवरील खर्च वाढू लागला. त्या खर्चाचे आकडे फुगू लागले. चैन, दिखावट यांवर खर्च वाढला. कर्जातून मुक्त

होण्यापेक्षा डामडौल - छानछोकीपणावर अधिक खर्च होऊ लागला. कर्ज कमी झाले नाही. केव्हाही कर्ज फेडू अशी गुर्मी तयार झाली. एकूण काय, मिळकत वाढली, खर्चही वाढला. आता खर्च भूक भागविण्यासाठी होत नव्हता. चैनीवर अधिक होऊ लागला. आदिवासी कधी सुधारणार नाहीत, असे आमचे सावकार म्हणू लागले. युवकांनी या साऱ्याचा अभ्यास केला. युवकांनी गावाच्या मिळकतीचा, खर्चाचा सारा हिशोब गावापुढे मांडला. त्यात दिसून आले की मिळकत वाढली, पण खर्चही वाढला. खर्च अनावश्यक गोष्टींवरील वाढला!

आणखी एक बाब त्यांनी लोकांसमोर मांडली. आपल्या भागात पाऊस चांगला होतो. पण कधी कधी पाऊस पुरेसा वेळेवर पडत नाही. त्यामुळे शेतातले उत्पन्न कमी होते. शेती जर नीट पिकायची असेल तर आपल्या भागात पडणाऱ्या पावसाचा नीट उपयोग करायला पाहिजे. शेततळी, बंधारे बांधले तर शेतीच्या उत्पन्नातील अनिश्चितता कमी करता येईल. यासाठी आपण प्रयत्न कां करू नयेत? उत्पन्न वाढवतो, त्याचबरोबर खर्चही वाढवतो. पण तो खर्च कशावर वाढवतो, त्यातून काय मिळवायचे ते ठरवले पाहिजे. शाळेची स्थिती चांगली करू या, मुले बाहेर जाऊन शिकावीत यासाठी पालकांना मदत करू या. खर्च वाढवू या, पण तो चैनीच्या बाबींवर नको. सांस्कृतिक कामावरही आपण कुठे खर्च करतो? जांभळाच्या, तेंदूपत्त्याच्या झाडांना जसे जपतो, तसेच संस्कृती, शिक्षण, पायाची जपणूक यांचीही काळजी घेतली पाहिजे. तेथेही समृद्धी निर्माण केली पाहिजे. अनेक नव्या-नव्या गोष्टी आम्ही शिकतोय. जांभळे जंगलाच्या जमिनीत जशी रसाळ, गोड होतात, तशी खासगी जमिनीत होत नाहीत, असे कां? जांभळाची नर्सरी केलीय, पण ती रोपे जंगलातच लावा असे जुनी माणसे म्हणत आहेत.

तरुणांच्या अभ्यासाला गावकरी दाद देत आहेत. जुन्या सांस्कृतिक गोष्टींना पुढे आणले जात आहे. सुरुवातीचा मिरीगाचा (मृगाचा) पाऊस जांभळांना नाही मिळाला तर जांभळे झाडावरच सुकतात. असा मृगाचा पाऊस दरवर्षी सांस्कृतिक उत्सवाच्या निमित्ताने पडत गेला, तरच जीवन जांभळासारखे गोड, तजेल, रसाळ होईल!

●●●